राज्यसेवा परीक्षा, २०२२ च्या अंतिम निकालाद्वारे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून निवड झालेल्या उपशिक्षणाधिकारी व तत्सम, गट ब संवर्गातील उमेदवारांच्या एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-१० (सीपीटीपी-१०) कालावधीकरीता २ अधिसंख्य पदे निर्माण करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक -ससप्रे-४४२४/प्र.क्र.२५९/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक:- २३ मे, २०२५.

**संदर्भ:-**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. टिआरएन २०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दि.२०.०१.२०१४
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पदनि २०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा १, दि.२०.०२.२०१६
३) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. बिंदूना ३०१६/ प्र.क्र.२००/प्रशा-२, दि.१७.११.२०१७
४) सामान्य प्रशासन विभाग, पत्र क्र. क्रमांक-टिआरएन-११२४/प्र.क्र.८४/प्रशि ३, दि. २२.११.२०२४.
५) कार्या. आदेश, सामान्य प्रशासन विभाग, क्र. टिआरएन-११२४/प्र.क्र.८४/प्रशि ३, दि.२१.०२.२०२५
६) सामान्य प्रशासन विभाग, पत्र क्र. क्रमांक-टिआरएन-११२४/प्र.क्र.८४/प्रशि ३, दि.१२.०३.२०२५
७) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. ससप्रे-४४२४/प्र.क्र.२५९/प्रशा-२,दि. २१.०३.२०२५
८) सामान्य प्रशासन विभाग, पत्र क्र. क्रमांक-टिआरएन-११२४/प्र.क्र.८४/प्रशि ३, दि.२७.०३.२०२५
९) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. ससप्रे-४४२४/प्र.क्र.२५९/प्रशा-२, दि. ०१.०४.२०२५
१०) सामान्य प्रशासन विभाग, पत्र क्र. क्रमांक-टिआरएन-११२४/प्र.क्र.८४/प्रशि ३, दि.२३.०४.२०२५

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परीक्षेद्वारे सन २०१४ पासून प्रतिवर्षी सरळ सेवेने नियुक्त होणाऱ्या गट- ब मधील पदांसाठी यशदा, पुणे या संस्थेमार्फत व गट ब मधील पदांसाठी वनामती प्रशिक्षण संस्था, नागपूर या संस्थेमार्फत दोन वर्षांच्या कालावधीसाठी एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयानुसार राबविण्यात येत आहे. त्याअनुषंगाने उपशिक्षणाधिकारी व तत्सम, गट ब संवर्गामध्ये महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून राज्यसेवा परीक्षा-२०२२ च्या अंतिम निकालाच्या आधारे निवड झालेल्या उपशिक्षणाधिकारी व तत्सम, गट ब संवर्गातील अधिकाऱ्यांना प्रशिक्षणार्थी अधिकारी म्हणून नियुक्ती देण्यात आली असून त्यांचे प्रशिक्षण एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-१० (सीपीटीपी-१०) अंतर्गत वनामती, नागपूर येथे दि.०२.०४.२०२५ पासून सुरु झाले आहे. सदर प्रशिक्षणासाठी प्रत्यक्ष उपस्थित झालेल्या उमेदवाराच्या संख्येच्या मर्यादेत अधिसंख्य पदे निर्माण करण्याबाबत संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये सूचना निर्गमित केल्या आहेत. सीपीटीपी-१० अंतर्गत (गट-ब) संवर्गातील परिविक्षाधीन

अधिकाऱ्यांच्या सेवाविषयक बाबींची पूर्तता करण्यासाठी संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये विभागीय शिक्षण उपसंचालक, नागपूर यांना नोडल अधिकारी म्हणून नियुक्त करण्यात आले आहे. सीपीटीपी-१० अंतर्गत (गट-ब) संवर्गातील परिविक्षाधीन अधिकाऱ्यांची ११७ अधिसंख्य पदे निर्माण करण्याबाबत संदर्भ क्र. ७ व ९ येथील शासन निर्णयान्वये निर्णय घेण्यात आलेला आहे. तसेच सामान्य प्रशासन विभागाने २ अधिकाऱ्यांना उपशिक्षणाधिकारी संवर्गात नियुक्ती आदेश संदर्भ क्र. १० येथील शासन आदेशान्वये निर्गमित करण्यात आले आहेत. त्यानुसार २ अधिसंख्य पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

राज्यसेवा परीक्षा २०२२ च्या अंतिम निकालाच्या आधारे शिफारस प्राप्त ठरलेल्या गट-ब उमेदवारांचा अनुक्रमे एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-१० (सीपीटीपी-१०) मधील ०१ व शहिदांचे वारस यांना देण्यात आलेली नियुक्तीनुसार ०१ अशा ०२ उमेदवारांची दिनांक ०२.०४.२०२५ पासून सुरु झालेल्या प्रशिक्षणासाठी दोन वर्षासाठीच्या कालावधीत वनामती प्रशिक्षण संस्था, नागपूर येथे करण्यात आली असून तेथे प्रशिक्षणासाठी रुजू होण्याचे आदेशित केले आहे. वनामती प्रशिक्षण संस्था, नागपूर येथे प्रत्यक्ष रूजू होणाऱ्या २ उमेदवारांकरिता २ अधिसंख्य पदे दिनांक २ एप्रिल, २०२५ पासून पुढे दोन वर्षांच्या कालावधीसाठी निर्माण करण्याकरिता संदर्भ क्र.१० येथील नियुक्ती आदेशातील अटी व शर्तीच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर ०२ अधिसंख्य पदे शालेय शिक्षण विभागाच्या अधिपत्याखालील शिक्षण आयुक्त, पुणे यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात येत आहेत.

३. शिक्षण आयुक्त, पुणे यांच्या आस्थापनेवरील उपशिक्षणाधिकारी व तत्सम, (गट-ब) संवर्गातील सदर २ अधिसंख्य पदांच्या दोन वर्षांच्या कालावधीतील परिविक्षाधीन अधिकाऱ्यांच्या वेतनावर होणारा खर्च "२२०२ सर्व साधारण शिक्षण-८० सर्व साधारण ००१ संचालन व प्रशासन (००)(०१) शिक्षण संचालक अनिवार्य (२२०२१०९१)" या लेखाशिर्षा मधून भागविण्यात यावा व तो त्या-त्या वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्रमांक १० येथील आदेशान्वये एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-१० (सीपीटीपी-१०) साठी मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत. त्यानुसार सदर प्रशिक्षार्थी अधिकाऱ्यांची सेवार्थ प्रणालीमध्ये नोंदणी करणे, डीसीपीएस क्रमांक मिळविणे, त्यांच्या वेतनासाठी आहरण व संवितरण अधिकारी नियुक्त करणे, परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना प्रशिक्षणाच्या पहिल्या महिन्यापासून संबंधित पदाचे नियमित वेतन प्रदान करणे, परिविक्षाधीन अधिकाऱ्यांची सेवापुस्तके तयार करणे इ. कार्यवाही प्रशिक्षणाच्या सुरवातीच्या ४ आठवडयात करण्याच्या सूचना आहेत. सबब, सदर परिपत्रकातील निर्देश

विचारात घेऊन आवश्यक कार्यवाही नोडल अधिकारी म्हणून विभागीय शिक्षण उपसंचालक, नागपूर यांनी करावी.

५. सदर शासन आदेश, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २०.०२.२०१६ मधील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०५२३१७५५२३९९२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DNYANESHWAR ASARAJI AVHAD

Digitally signed by DNYANESHWAR ASARAJI AVHAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=190ce31a764c50caee9a11b81ac560fc0d85bb0ebc377f46c4fc0040aae47135, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=05AE42076719D0FCE5DC8ACF3A44FBA50819DD0D088B25A2D0D7CDE0256A48B0, cn=DNYANESHWAR ASARAJI AVHAD
Date: 2025.05.23 17:56:20 +05'30'

**(ज्ञानेश्वर आव्हाड)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१.महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई ४०००२०.
२.महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई ४०००२०.
३.महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर
४.महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
५.अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६.आयुक्त (शिक्षण) यांचे कार्यालय, महाराष्ट्र राज्य,पुणे.
७. महासंचालक,यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, राजभवन आवार, बाणेर रस्ता, पुणे.
८.महासंचालक,वंसतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, वनामती, बोले पेट्रोल पंप जवळ, अमरावती रोड, धरमपेठ, नागपूर-४४२४१०.
९.निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१०.जिल्हा कोषागार कार्यालय,नागपूर
११.कक्ष अधिकारी (प्रशा-५), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.वित्त विभाग (वित्तीय सुधारणा-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.निवडनस्ती.